जालना पोलीस प्रशिक्षण केंद्र येथुन ३०० पोलीस कर्मचारी नागपूर येथे ने-आण करण्यासाठी भाडेतत्वावर घेण्यात आलेल्या एस.टी. बसेसच्या भाड्यापोटी देय असलेली रु.८,००,४३३/- इतकी रक्कम अदा करण्याच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-०३२०/१३७/प्र.क्र.४५/विशा १ अ**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १४ सप्टेंबर, २०२०.

संदर्भ :- १) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/ वाह.अधि. एस.टी.बस/पो.आ.नागपूर/१८/२०२०, दिनांक २४.०१.२०२०.
२) पोलीस उप आयुक्त (मुख्या), पोलीस आयुक्त कार्यालय, नागपूर शहर यांचे पत्र क्र.पोआना/जी-६/५२/बंदोबस्त/एस.टी.बस/वाहने/१४०४/२०१९, दिनांक २३.१२.२०१९.

**प्रस्तावना :-**

नागपूर येथे ६३ वा धम्मचक्र परिवर्तन दिनानिमित्त दिक्षाभुमी या ठिकाणी दरवर्षी प्रमाणे अनुयायांच्या उपस्थितीत कार्यक्रम साजरा करण्यात आलेला आहे. सदर कार्यक्रमाच्या बंदोबस्ताकरीता पोलीस आयुक्त, नागपूर शहर यांनी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडून पोलीस प्रशिक्षण केंद्र, जालना येथील ३०० पोलीस प्रशिक्षणार्थी कर्मचारी यांना दिनांक ०३.१०.२०१९ ते दिनांक ०९.१०.२०१९ पर्यंत जालना येथुन नागपूर येथे ने-आण करणेकरीता आगार व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, गणेशपेठ आगार, नागपूर यांचेकडून एकुण १४ एस.टी.बसेस भाडेतत्वावर घेण्यात आलेल्या होत्या. सदरहु महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसेसच्या भाड्यापोटी रु.८,००,४३३/- (अक्षरी रुपये आठ लाख चारशे तेहतीस फक्त) इतकी देय रक्कम अदा करण्याच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी देण्याची व सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून सदर रक्कम खर्च करण्यास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

नागपूर येथे ६३ वा धम्मचक्र परिवर्तन दिनानिमित्त दिक्षाभुमी या ठिकाणी दरवर्षी प्रमाणे अनुयायांच्या उपस्थितीत कार्यक्रम साजरा करण्यात आलेला आहे. सदर कार्यक्रमाच्या बंदोबस्ताकरीता पोलीस आयुक्त, नागपूर शहर यांनी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडून पोलीस प्रशिक्षण केंद्र, जालना येथील ३०० पोलीस प्रशिक्षणार्थी कर्मचारी यांना दिनांक ०३.१०.२०१९ ते दिनांक ०९.१०.२०१९ पर्यंत जालना येथुन नागपूर येथे ने-आन करणेकरीता आगार व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन मंडळ, गणेशपेठ आगार, नागपूर यांचेकडून एकुण १४ एस.टी.बसेस भाडेतत्वावर घेण्यात आलेल्या होत्या. सदरहु महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसेसच्या भाड्यापोटी रु.८,००,४३३/- (अक्षरी रुपये आठ लाख चारशे तेहतीस फक्त) इतक्या देय रक्कमेस वित्तीय वर्ष २०२०-२०२१ च्या विहित लेखाशिर्षाखालील शिल्लक अनुदानातून अदा करण्याच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी मंजुरी देण्यात येत आहे.

सदरचा खर्च मागणी क्र. " बी-१, २०५५, पोलीस (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस बल, दत्तमत (२०५५०१६८) ५०- इतर खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षातील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग - १ मधील अनुक्रमांक ६, नियम-४०(१) अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या पूर्ण अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००९१४१४३६३६८४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Deepak Tukaram Kharat

Digitally signed by Deepak Tukaram Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=902e21bb580b52a1e246b37b697ca20f0db2834da41f6840afd03916d8ed1b76, serialNumber=d8bd67045829179609f51b88a183cd0a4a3acd98db48b22b5faf5a9efc780e70, cn=Deepak Tukaram Kharat
Date: 2020.09.14 14:38:27 +05'30'

**( दि. तु. खरात )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, नागपूर शहर.
३. महालेखापाल-२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा नागपूर.
५. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. निवडनस्ती.